"मी मुख्यमंत्री  बोलतोय" हा कार्यक्रम पुन्हा नव्या स्वरुपात सुरु करण्यासाठी तसेच सदर कार्यक्रमासाठी ई-निविदा प्रक्रीया राबवून संस्थेची निवड करण्यासाठी प्रशासकिय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.१२५/३४**
मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ३ ऑगस्ट ,२०२३

**वाचा:-** १. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१४२/का-३४ दि. ०५/१०/२०१७
२. माहिती व  जनसंपर्क महासंचालनालय यांचे पत्र क्र.वृत्तचित्र-२०२३/कार्यक्रम निर्मिती-मी मुख्यमंत्री बोलतोय/का-७/१०,  दि.१३ एप्रिल,२०२३.

**प्रस्तावना :-**

जनतेशी थेट संवाद साधण्यासाठी तसेच शासन राबवित असलेल्या विविध जनकल्याणकारी योजना जनतेपर्यंत पोहोचविण्याच्या दृष्टीने दृकश्राव्य माध्यमांसाठी मा.मुख्यमंत्री महोदयांचा सहभाग असलेले जय महाराष्ट्र/ दिलखुलास व मी मुख्यमंत्री बोलतोय हे कार्यक्रम उक्त संदर्भ क्र.-१ येथील  दिनांक ५ ऑक्टोबर २०१७ च्या शासन निर्णयान्वये सुरु करण्यात आले होते. शासन राबवित असलेल्या विविध जनकल्याणकारी योजना जनतेपर्यंत पोहविण्याच्या दृष्टीने मा.मुख्यमंत्री महोदयांचा सहभाग असलेला "मी मुख्यमंत्री बोलतोय" हा कार्यक्रम नव्या स्वरुपात पुन्हा सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन राबवित असलेल्या विविध जनकल्याणकारी योजना जनतेपर्यंत पोहोचविण्याच्या दृष्टीने मा. मुख्यमंत्री महोदयांचा सहभाग असलेला "मी मुख्यमंत्री बोलतोय" हा कार्यक्रम दूरचित्रवाणी वाहिनी आणि रेडिओवर नव्या स्वरुपात पुन्हा सुरु करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. तसेच "मी मुख्यमंत्री बोलतोय" या कार्यक्रमाच्या निर्मितीकरिता ई-निविदा प्रसिद्ध करुन संस्थेची निवड करण्याची प्रक्रिया राबविण्यासाठी प्रशासकीय  मान्यता देण्यात येत आहे.

२. "मी मुख्यमंत्री बोलतोय" हा कार्यक्रम प्रत्येक महिन्यात कमाल दोन वेळा, तर वर्षातून कमाल २४ वेळा प्रसारित करण्यात येईल.

३. प्रस्तूत खर्च सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्र. ए-६,२२२०- माहिती व प्रसिध्दी, ६० इतर, १०१ जाहिरात व दृक प्रसिध्दी (००) (०३) शासकीय योजनांची विशेष प्रसिध्दी मोहिम योजना अंतर्गत, २६ जाहिरात व प्रसिध्दी (संगणक सांकेतांक क्र. २२२०११७५ ) या लेखाशीर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०८०३१६३८३३५९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RIMA SUBHASH DUTTAROY

Digitally signed by RIMA SUBHASH DUTTAROY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=487393c812e41c98e63a7a73c63e1d078da4c3c899b4307a07d4d99b40a7d635, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B813A4CECE1744D0527A20F20D15FC2FFC7D4457A8AE2120E0D35781B42C049C, cn=RIMA SUBHASH DUTTAROY
Date: 2023.08.03 16:41:42 +05'30'

**( रिमा दत्तरॉय )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानपरिषद व विधानसभा सदस्य.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर, महाराष्ट्र
१४. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर, महाराष्ट्र
१५. अधिदान व अधिदान लेखाधिकारी, मुंबई
१६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१७. विधि व न्याय विभाग/सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. धर्मादाय आयुक्त, वरळी, मुंबई
१९. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२०. सर्व उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२१. सर्व जिल्हा माहिती अधिकारी
२२. सर्व संबंधित संस्था व समिती सदस्य
२३. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. संचालक, (माहिती) (वृत्त व जनसंपर्क) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२५. संचालक, (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

२६. उपसंचालक (वृत्त), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

२७. सर्व विभागीय उपसंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई, कोकण, पुणे, कोल्हापूर, नाशिक, औरंगाबाद, लातूर, अमरावती, नागपूर

२८. सर्व जिल्हा माहिती अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय

२९. संचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, अ-८ स्टेट एम्पोरियम इमारत, बाबा खडकसिंग मार्ग, नवी दिल्ली- ११०००१

३०. वरिष्ठ सहाय्यक संचालक, महाराष्ट्र परिचय केंद्र, श्री.काकुले यांची इमारत, दादा वैद्य रोड, पणजी, गोवा.

३१. निवड नस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग

३२. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ.कुटीर क्र.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०

३३. भारतीय राष्ट्रीय काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५

३४. राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन.हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई-४०० ०३८.

३५. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.

३६. बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र. ८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४

३७. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल मार्ग,मुंबई–४०० ००४.

३८. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस,वरळी, मुंबई-४०० ०१३

३९. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-४०० ०२८.